**आगामी सिंहस्थ कुंभमेळयाच्या कामास येणा-या खर्चासाठी आकस्मिकता निधीतून अग्रीम मंजुरी.**

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: कुंभमे-२००२/प्र.क्र.१७/का.१४७३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :३० मार्च,२००२

**शासन निर्णय :-**

आगामी सिंहस्थ कुंभमेळा सन २००३-०४ मध्ये नाशिक व त्र्यंबकेश्वर येथे होणार आहे. सिंहस्थातील कामे कालमर्यादेत पूर्ण करावयाची असल्याने जिल्हाधिकारी, नाशिक यांना आकस्मिकता निधीतून अग्रीमाव्दारे रु.१०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहेत. सदर रक्कम ३० मार्च, २००२ पर्यन्त खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी. यासाठी जिल्हाधिकारी, नाशिक यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक "ओ-१-२०५३,जिल्हा प्रशासन- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ०९३ (०१) (००) जिल्हाधिकारी, नाशिक, नाशिक येथील सिहस्थ कुंभमेळयासाठी होणारा खर्च (२०५३ १०९८) ४१ सहाय्यक अनुदान" या लेखाशीर्षा- खाली खर्ची टाकण्यात यावा व वित्त विभाग ज्ञापन क्रमांक: आकनि- ११.०२/१०१/अर्थसंकल्प-१५, संगणक क्रमांक-८०००-१०१-२, दिनांक २८.३.२००२ अन्वये आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या रु.१०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) या रक्कमेतून भागविण्यात यावा.

३. आकस्मिकता निधी अग्रीम नियम क्रमांक ६ अन्वये आकस्मिकता निधीतून घेतलेल्या आगाऊ रक्कमेतून खर्च करण्यासाठी जी देयके सादर करावयाची असतात त्या देयकांच्या वरील बाजूला "आकस्मिकता निधी" असे लाल शाईने ठळकपणे लिहावे. तसेच त्या देयकावर वित्त विभागाच्या ज्या

ज्ञापनांन्वये आकस्मिकता निधीतून आगाऊ रक्कम मंजूर केली असेल त्या ज्ञापनाचा क्रमांक व दिनांक लाल शाईने लिहावा.

४. आगामी अधिवेशनामध्ये आकस्मिकता निधीची भरपाई करण्यासाठी पूरक मागणी सादर करण्यात येईल.

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक- सीआर-२८७/२००२/व्यय-८, दिनांक १३.३.२००२ आणि अर्थोपाय शाखेचा अनौ.संदर्भ क्रमांक - ९६०/अर्थोपाय/२००२, दि. ३०.३.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अं. शा. घार्गे )
अवर सचिव, नियोजन विभाग.

प्रति,

जिल्हाधिकारी, नाशिक
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
महालेखपाल, लेखा व अनुज्ञेयता,(१),महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल, लेखा व परीक्षण, (१),महाराष्ट्र, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,
५ वा मजला, मुंबई (दोन प्रती),
वित्त विभाग, का. व्यय-८/ अर्थसंकल्प-३/ अर्थसकल्प-१५
निवड नस्ती, का.१४७३, नियोजन विभाग

GR-20020411160322000-1400